# लिंकन यांचें गेटिस्बर्ग येथील भाषण

**राष्ट्राध्यक्ष लिंकन यांनीं १८६३ सालीं यादवी युद्ध चालू असतांना व गेटिस्बर्ग येथील लढाई-नंतर लौकरच एक राष्ट्रीय स्मशानभूमि या नात्यानें त्या रणभूमीचें संस्करण करण्यासाठीं पुढील चार शब्द आपल्या भाषणांत सांगितले. अमेरिकन वृत्तीचा आविष्कार या नात्यानें हे शब्द चिरकाल टिकतील.**

"सत्याऐंशी वर्षांपूर्वी आपल्या वाडवडिलांनीं या भूमीवर एका नव्या राष्ट्राची निर्मिति केली. या राष्ट्राचा जन्म स्वातंत्र्यांतून झाला आणि सगळे मानव जन्मतःच समान आहेत, हा सिद्धांत त्यांना प्रस्थापित करावयाचा होता.

"आतां आपण एका प्रचंड यादवींत गुंतलों आहों. आपलें हें राष्ट्र किंवा अशाच सिद्धान्तावर उभारलेलें दुसरें कोणतेंहि राष्ट्र जास्त टिकूं शकतें कीं नाहीं, याचा निर्णय यादवीनें केला जाईल. आपण त्या युद्धाच्या रणांगणावर जमा झालों आहों. या राष्ट्राला जिवंत ठेवण्यासाठीं ज्या लोकांनीं आपल्या प्राणांची आहुति दिली त्यांना अंतिम विश्रांतिस्थान प्राप्त व्हावें म्हणून या रणांगणाचा कांहीं भाग राखून ठेवण्यासाठीं आपण येथें आलों आहों. असें करणें सर्वस्वीं उचित आहे.

"पण थोड्या विशाल दृष्टीनें पाहिलें तर या स्थळाचें समर्पण किंवा संस्करण किंवा शुद्धीकरण आपण करूं शकणार नाहीं. जे जिवंत आणि मृत वीर या भूमीवर लढले त्यांनीं तिला इतकी पावन केली आहे कीं, आपल्याला तिचें पावित्र्य वाढविणें किंवा कमी करणें शक्य होणार नाहीं. आपण येथें जें कांहीं बोलूं त्याकडे जगाचें क्वचितच लक्ष जाईल आणि गेलें तरी त्याच्या स्मृतिपटावर तें फार वेळ टिकणार नाहीं. पण या वीरांनीं जें केलें त्याचें विस्मरण जगाला कधींहि होऊं शकणार नाहीं. येथें लढून त्या वीरांनीं जें मंगल केलें तें अद्याप अपूर्ण आहे. त्या कार्याला आपलें जीवन वाहून घेणें हें आपणां सर्वांचें कर्तव्य आहे. आपल्यापुढें प्रचंड कार्य आहे. त्याला आपण आपलें जीवन समर्पण केलें पाहिजे. ज्या सन्मान्य पुरुषांनीं या कार्यापायीं आपलें बलिदान देऊन आपली अद्भुत कार्यनिष्ठा प्रकट केली, त्यांच्यापासून आपण तें कार्य पुरें करण्याची निष्ठा मिळविली पाहिजे. त्या वीरांचें बलिदान आम्ही निष्फळ होऊं देणार नाहीं, अशी प्रतिज्ञा आपण केली पाहिजे. ईश्वराच्या कृपाछत्राखालीं आपल्या देशाला स्वातंत्र्याचें नवजीवन प्राप्त होऊन जनतेसाठीं, जनतेनें चालविलेलें आणि जनतेच्या मालकीचें हें राज्य यावच्चंद्र दिवाकरौ जिवंत राहील, अशीहि प्रतिज्ञा आपण केली पाहिजे."

**अब्राहम लिंकन**—मानवाच्या इतिहासांत अमेरिकेचे सोळावे राष्ट्राध्यक्ष अब्राहम लिंकन यांचें स्थान अतुलनीय आहे. त्यांची जन्मजात परोपकार वृत्ति, त्यांची सहनशीलता, सर्वसामान्य माणसाविषयीं त्यांना वाटणारें प्रेम, जनतेसाठीं, जनतेनें चालविलेलें आणि जनतेच्याच मालकीचें राज्य यांविषयींची त्यांची निष्ठा, त्यांच्या जीवनाचें स्वरूप आणि त्यांना ज्या तऱ्हेनें मृत्यु आला, ती तऱ्हा यांमुळें लिंकन यांना हें स्थान मिळालेलें आहे.

भवितव्य—१८०९ सालीं, अब्राहम लिंकन यांचा जन्म झाला. त्या वेळीं अमेरिकेंत गुलामगिरीची पद्धत अस्तित्वांत होती. अब्राहम लिंकन हे अशिक्षित शेतमजूर होणार असें दिसत होतें. गुलामगिरीचें उच्चाटन करून ते सर्व अमेरिकनांना स्वातंत्र्य व समता यांची प्राप्ति करून देतील आणि मानवाच्या इतिहासांतील सर्वांत थोर विभूतींमध्यें त्यांची गणना होईल असें त्या वेळीं कोणाला वाटलें नव्हतें. त्यांच्या जीवनांत लोकशाही, मानवी हक्क आणि व्यक्तीची प्रतिष्ठा यांचा खरा अर्थ आढळतो.

अमेरिका--एकोणिसाव्या शतकाच्या सुरुवातीस अमेरिकेचा नुकताच उदय झाला होता व ती विकास पावत होती. सुमारें पंचवीस वर्षांपूर्वींच तिनें स्वातंत्र्य मिळविलें होतें. वसाहतींच्या काळापासून गुलामगिरी चालत आली होती. वसाहती झालेल्या पूर्वेकडील भागांतून अद्याप जेथें वसाहती झालेल्या नव्हत्या व जेथें रस्ते नव्हते अशा पश्चिमेकडील भागाकडे पहिल्या वसाहती करणारे लोक जात होते. या ओबडधोबड व नव्या देशांत अब्राहम लिंकन यांचे वडील कसाबसा उदरनिर्वाह चालविण्याचा प्रयत्न करीत होते.

**कुटुंब**—अब्राहम लिंकन यांचे वडील सुतार होते, पण आपल्या कुटुंबाचें पोषण करण्यासाठीं शिकार मिळविण्याकरितां त्यांना जंगलांत बराच काळ काढावा लागत असे. अब्राहम यांच्या दयाळु मातोश्री नॅन्सी हॅन्क्स लिंकन यांना अब्राहम, त्यांची बहीण आणि शेत यांची व्यवस्था पाहावी लागे. आपल्या मातोश्रीनींच आपल्या जीवनाला स्फूर्ति दिली, असें अब्राहम लिंकन यांनीं म्हटलें आहे. ते म्हणाले, "ईश्वर माझ्या आईस शांति देवो. मीं आज जें स्थान मिळविलें आहे, अथवा भविष्य-काळांत जें स्थान मी मिळवीन त्याचें सर्व श्रेय तिलाच आहे."

शाळा—आसपासच्या भागांत लांकडाच्या ओंडक्याच्या घरांत शाळा उघडण्यांत आली, तेव्हां सौ. लिंकन यांनीं आपला मुलगा अब्राहम आणि त्यांची बहीण यांना धुळाक्षरें शिकण्या-साठीं व स्पेलिंगच्या पुस्तकावर प्रभुत्व मिळविण्यासाठीं शाळेंत पाठविलें. सौ. लिंकन यांनीं त्यांना सांगितलें, "वाचण्यास आणि लिहिण्यास तुम्हीं शिकलें पाहिजे. तुम्हीं ज्ञान मिळविलें पाहिजे म्हणजे तुम्हीं मोठेपणीं शहाणे व चांगले व्हाल." अब्राहम लिंकन यांनीं हे शब्द सदोदित लक्षांत ठेवले.

इंडियाना—अब्राहम लिंकन सात वर्षांचे होते, तेव्हां त्यांच्या वडिलांनीं हें कुटुंब इंडियानामधील एका शेतांत नेलें. हा भाग त्या वेळीं जंगलमय होता. या भागांत शरद् ऋतूच्या अखेरीस लिंकन कुटुंबानें आपल्या नव्या घरासाठीं जंगल तोडून साफ करण्यास सुरुवात केली. हिंवाळा अगदीं तोंडाशीं आला होता. म्हणून सुबकपणाकडे लक्ष देण्यापेक्षां थोड्याशा घाईनेंच त्यांनीं लांकडांच्या ओंडक्यांचें घर बांधलें. या ठिकाणीं शाळा नव्हती आणि अब्राहम लिंकन शेतावर काम करूं लागले.

**दुःखद घटना**—१८१८ सालच्या शरद् ऋतूमध्यें खेडोपाडीं एका विचित्र आजाराची सांथ पसरली तीमुळें कित्येक लोक आणि गुरेंढोरें मृत्युमुखीं पडलीं. अब्राहम यांची आईहि मरण पावली. जिनें अब्राहम यांच्यावर व इतर कुटुंबियांवर अत्यंत प्रेम केलें आणि त्यांची सेवा केली, तिच्यासाठीं अब्राहम यांच्या वडिलांनीं अब्राहमच्या साहाय्यानें ओबडधोबड देवदारी फळ्यांची एक शवपेटिका तयार केली.

**एकाकीपणा**—हिंवाळ्यांत लिंकन कुटुंबाला एकटेपणाची फार जाणीव होऊं लागली. केविलवाण्या मुलांना आपल्या आईची फार आठवण येऊं लागली. खाद्यपदार्थांसाठीं त्यांच्या वडिलांना जंगलांत शिकारीसाठीं जाणें भाग पडे आणि जंगलांतील त्या झोपडींत मुलांना दीर्घकाल एकटें राहावें लागे. अशा एकाकी रात्रीं नऊ वर्षांचे अब्राहम आपल्या बहिणीस दिलासा देत असत.

नवें प्रेम—वडिलांनीं नवी आई घरीं आणली, तेव्हां सर्वांना आनंद वाटला. अब्राहम यांच्या नव्या मातोश्री पूर्वीं विधवा होत्या व त्यांना एक मुलगा व दोन मुली होत्या. नव्या सौ. लिंकन या अंगापिंडानें बळकट व कार्यक्षम होत्या. त्यांनीं त्या अव्यवस्थित झोंपडीस व्यवस्थित स्वरूप दिलें. लवकरच तें घर सुपरिणामदायक अशा कौटुंबिक प्रेमानें पुनः भरून गेलें.

**प्रश्न**—अब्राहम लिंकन ११ वर्षांचे होते, तेव्हां लिंकन यांच्या शेताजवळ एक शाळा बांधण्यांत आली. त्या वेळीं अब्राहम यांना शाळेंत घालावयाचें किंवा कसें असा प्रश्न निर्माण झाला. त्यांच्या वडिलांचें म्हणणें असें कीं, अब्राहमसारख्या सशक्त मुलाचा उपयोग शाळेपेक्षां शेतावरच अधिक होईल. परंतु अब्राहम यांनीं शाळेंतच जावें असें सौ. लिंकन यांना वाटत होतें.

**पुस्तकें**—अब्राहम यांनीं शाळेंत जावें असा त्यांच्या सावत्र आईनें आग्रह धरला. लिंकन यांना या वेळेपासून पुस्तकांच्याविषयीं आवड वाटूं लागली. पण शेतीच्या कामांसाठीं त्यांची गरज लागत असल्यानें त्यांना नियमितपणें शाळेंत जातां येत नसे. त्यांनीं सुमारें वर्षभरच शाळेंत शिक्षण घेतलें, पण जें जें पुस्तक हातीं येईल तें तें त्यांनीं वाचून काढलें. एखादें पुस्तक मागून घेण्याकरितां किंवा तें परत करण्यासाठीं ते मैलच्या मैल चालत असत.

अभ्यास—शेतावर दिवसभर काम केल्यानंतर अब्राहम आपल्या झोंपडींतील मोठ्या शेगडीजवळ धगधगत्या कोळशांच्या प्रकाशांत वाचत बसत आणि लांकडाच्या फावड्यावर कोळशानें लिहीत असत. फावड्याचा पृष्ठभाग लिखाणानें भरून गेल्यावर ते पुनः लिहिण्यासाठीं पूर्वींचें लिखाण पुसून काढीत.

गुलामगिरी—१९ व्या वर्षी लिंकन यांनीं एका सपाट बोटी-वरून मिसिसिपी नदींतून न्यू ऑर्लीन्सपर्यंत प्रवास केला. तेथें त्यांचा गुलामगिरीशीं प्रथम संबंध आला. तीबद्दल त्यांना उबग वाटूं लागला. त्यानंतर लवकरच लिंकन कुटुंबानें पश्चिमेकडील आपला प्रवास सुरू केला. तें कुटुंब इलिनॉयमध्यें गेलें आणि त्यानें पुनः जमीन साफ करून झोंपडी बांधली.

**कारकून**—बाविसाव्या वर्षी, लिंकन इलिनॉयच्या सीमेवरील एका दुकानांत कारकून म्हणून काम करूं लागले. त्यांच्या विचारांची व भावनांची सखोलता, त्यांचा प्रामाणिकपणा, सौम्य विनोद आणि दयाळूपणा यांमुळें ते लोकप्रिय झाले. ते गोष्टी सांगण्यांत व वादविवाद करण्यांत पटाईत होते, तसेंच ते शासनव्यवस्थेचा बारकाईनें अभ्यास करीत होते. इलिनॉय राज्याच्या कायदेमंडळाच्या निवडणुकीसाठीं उभें राहण्यास लिंकन यांना त्यांच्या मित्रांनीं प्रोत्साहन दिलें.

कायदेमंडळ—लिंकन यांनीं राजकारणांत प्रवेश केला, तेव्हां ते पंचवीस वर्षांचे होते. ते उंच व ओबडधोबड दिसत असत. रुंद कडेची हॅट, हातमागाच्या कापडाचा सदरा, लांब कोट आणि आखूड विजार असा त्यांचा पेहराव होता. त्यांच्याकडे पाहून तिऱ्हाइतांना वाटे, "हा कोणी तरी विदूषक आहे." पण जेव्हां ते बोलत, तेव्हां त्यांच्यांतील सफाईच्या अभावाची सर्व जाणीव नष्ट होत असे. १८३४ सालीं अब्राहम लिंकन यांची निवड इलिनॉयच्या कायदेमंडळावर झाली.

कायदा---राज्य विधिमंडळांत असतांना व लोकसेवेनंतर मिळणाऱ्या फुरसतीच्या अल्प वेळीं लिंकन यांनीं कायद्याचा अभ्यास केला. त्यांची तीन वेळां विधिमंडळासाठीं फेरनिवड करण्यांत आली. १८३६ सालीं त्यांना वकिली करण्याची मुभा देण्यांत आली. बऱ्याच वेळां त्यांचे अशील त्यांची फी देण्यास असमर्थ ठरल्यास ते त्यांच्याकडून शेतकी माल घेत असत.

**अद्भुत प्रेमकथा**—ॲन रटलज हिच्या प्रेमपाशांत लिंकन सांपडले होते. परंतु त्या दोघांचा विवाह ठराविक कालीं होण्यापूर्वींच कांहीं दिवस अगोदर ती मरण पावली. त्यामुळें लिंकन हताश झाले. झालेल्या दुःखाचा विसर पाडण्यासाठीं ते अधिक काम व इतरांची अधिक सेवा करूं लागले. यानंतर कित्येक वर्षांनीं व वकील या नात्यानें परिस्थितीशीं झगडत असतांना त्यांची मेरी टॉड यांच्याशीं गांठ पडली. त्यांचा विवाह १८४३ मध्यें झाला. लिंकन यांनीं अमेरिकन कॉंग्रेसची निवडणूक लढवावी अशी त्यांच्या मित्रांची इच्छा होती.

**कॉँग्रेस**—३७ व्या वर्षी लिंकन यांनीं राष्ट्राच्या राजकीय क्षेत्रांत प्रवेश केला आणि प्रतिनिधिसभेचे सदस्य या नात्यानें त्यांना एका ठराविक कालावधीसाठीं निवडून देण्यांत आलें. कॉंग्रेसची कनिष्ठ सभा म्हणून प्रतिनिधिसभा गणली जाते. या जागेवर असतांना त्यांनीं गुलामगिरीला व नव्या राज्यांतून व प्रदेशांतून तिचा फैलाव होऊं देण्यास धडाडीनें विरोध केला.

**फाटाफूट**—वासाहतिक दिवसापासून व त्यानंतरहि अमेरिकेंत आणण्यांत आलेल्या नीग्रोंना गुलाम या नात्यानें वागविलें जात असे. या प्रश्नावर आतां देशांत विलक्षण फूट पडली. एका स्वतंत्र देशांत एका इसमानें दुसऱ्याला गुलाम करण्याची प्रथा वाईट आहे असें म्हणून तीविरुद्ध लिंकन यांनीं ओरड केली. "प्रत्येक मनुष्याला स्वतंत्र बनण्याचा शाश्वत व पवित्र हक्क आहे" या गोष्टीवर त्यांचा श्रद्धा होती व त्याप्रमाणें त्यांनीं प्रचारहि केला.

**वादविवाद**—१८५८ मध्यें गुलामगिरीचा अमेरिकेंत अधिक फैलाव होईल असें दिसल्यानंतर लिंकन यांनीं आपली वकिली सोडून दिली आणि अमेरिकन काँग्रेससाठीं पुन्हां मोहीम सुरू केली. परंतु या खेपेस ही मोहीम सेनेटर या नात्यानें होती. त्यांच्या मोहिमेचें रूपांतर त्यांचे प्रतिस्पर्धि स्टीफन ए. डग्लस यांच्याशीं अनेक वादविवाद करण्यांत झालें. डग्लस निवडून आले. परंतु लिंकन यांचें नांव या वादविवादामुळें राष्ट्रांत सर्वत्र झालें.

अध्यक्ष—लिंकन यांनीं गुलामगिरीविरोधी आपला लढा निर्भयपणें चालू ठेविला. आणि १८६० मध्यें प्रखर वादविवाद केला जात असतांना लिंकन यांना अमेरिकेचे राष्ट्राध्यक्ष म्हणून निवडून देण्यांत आलें. देशांत सर्वत्र प्रक्षोभ माजला. राष्ट्राध्यक्ष-पदीं त्यांची निवड झाल्यानंतर गुलामगिरीच्या प्रश्नावर दीर्घ-कालपासून अपेक्षित असलेली फूट राष्ट्रांत पडली. दक्षिणेकडील अकरा राज्यें संघराज्यांतून फुटून बाहेर निघालीं. या राज्यांनीं अमेरिकन संघराज्यावरील आपली निष्ठा काढून घेतली आणि त्यांनीं "कॉन्फेडरेट स्टेट्स ऑफ अमेरिका" (अमेरिकेंतील राज्यांचें मंडळ) या नांवाचें मंडळ बनविलें.

युद्ध—बऱ्याच भांडणानंतर आणि ऐक्य व शांतता यासाठीं लिंकन यांनीं केलेले प्रयत्न न जुमानून, कॉन्फेडरेटस्‌नीं (फुटून बाहेर पडलेल्या राज्यांचे घटक) युनियनच्या (संघराज्य) एका किल्ल्यावर गोळीबार केला व या प्रमाणें या तरुण राष्ट्राला एका घनघोर यादवी युद्धांत लोटलें (१८६१–६५). मानवताप्रेमी लिंकन दुःखानें हळहळले. त्यांना तिटकारा वाटत असलेली गुलामगिरी चालू राहिली एवढेंच नाहीं तर त्यांचे अमेरिकन देशबांधव एकमेकांशीं लढत होते आणि संघराज्याच्या सैन्याचें अफाट नुकसान झालें.

उद्दिष्टें—लिंकन यांच्या जीवनांत यापुढें दोन उद्दिष्टें होतीं. फूट पडलेल्या देशाची एकजूट करणें आणि गुलामांना स्वतंत्र करणें. मानवहितासाठीं झटणारे आणि संघराज्यांचे सर-सेनानी या नात्यानें त्यांचें कार्य जहाल टीकाकारांनीं अधिक बिकट केलें. लिंकन यांनीं शांततेसाठीं मनोभावानें प्रार्थना केली आणि आपल्या उद्दिष्टांना ते चिकटून राहिले. त्यानंतर युद्धाचें पारडें संघराज्यवाद्यांचा पथ्यावर पडेल अशा रीतीनें फिरलें.

**बंधविमोचन**—अखेर १८६३ मध्यें युद्ध चालू असतांनाच इतिहासांतील एक महान् दस्तऐवज अस्तित्वांत आला. गुलामांना स्वतंत्र करणारा बंधविमोचनाचा आपला जाहीरनामा लिंकन यांनीं प्रसिद्ध केला. आपले देशबांधव एकेकाळच्या शांततामय शेतांच्या रणांगणावर मृत्युमुखीं पडत चालल्याचें पाहून त्यांच्या हृदयाला पीळ पडूं लागला व त्यामुळें त्यांनीं शांतता व संघराज्याची एकजूट घडवून आणण्यावर आपलें सर्व लक्ष केंद्रित केलें.

**गेटिस्बर्ग येथील भाषण**—त्यानंतर १८६३ मध्यें लिंकन यांनीं एक भाषण केलें. हें भाषण इतिहासांतील एक अत्यंत प्रसिद्ध भाषण म्हणून गणण्यांत येत आहे. धारातीर्थीं पडलेल्या सैनिकांच्या स्मशानभूमीचें गेटिस्बर्ग येथें संस्करण करतांना त्यांनीं जे अमर शब्द उच्चारले त्यावरून लोकशाही ध्येयाचा उत्तम प्रकारें आविष्कार होतो. "जनतेसाठीं, जनतेनें चालविलेलें आणि जनतेच्याच मालकीचें राज्य" हेच ते शब्द आहेत.

फेरनिवड—लिंकन यांची लोकप्रियता राष्ट्राध्यक्षपदाच्या त्यांच्या पहिल्या कालमर्यादेच्या प्रारंभींच्या कांहीं दिवसांत मोठ्या प्रमाणांत ओसरली. तथापि १८६४ सालीं राष्ट्राध्यक्षपदीं त्यांना पुन्हां निवडून देण्यांत आलें. राज्याराज्यांत पडलेल्या दुफळीबाबत आणि युद्धाच्या अगोदरच्या कालांत संघराज्याच्या सैन्यास जे पराभव मिळाले त्याबाबत कित्येकांनीं त्यांना दोष दिला. परंतु गुलामांना मुक्त करण्यासंबंधांच्या त्यांच्या जाहीरनाम्यानें व संघराज्याच्या नव्या विजयांमुळेंच उत्तर भागांतील त्यांचें वजन वाढलें.

शांतता—१८६५ सालीं युद्ध अखेर समाप्त झालें आणि संघ-राज्याच्या सैन्यास विजय मिळाला. यापुढें एका कुटुंबाविरुद्ध दुसरें कुटुंब असें करण्याचें कारण उरलें नाहीं. ही दुःखदायक घटना चार वर्षेंपर्यंत टिकली. स्वातंत्र्य व शांतता यांचा अंमल पुन्हां चालू झाला आणि संघराज्य बचावलें. सर्व देश आनंदानें बेहोष झाला. सर्व देवळांमध्यें आभार मानण्यासाठीं प्रार्थना करण्यांत आल्या.

खून—शांतता व ऐक्य यासंबंधींच्या आपल्या योजना फलद्रुप झालेल्या पाहण्यास लिंकन जगले नाहींत. युद्धाच्या काळजीं-तून मुक्त झाल्यावर अवघ्या पांच दिवसानंतरच वॉशिंग्टन येथील एका थिएटरमध्यें लिंकन बसले असतांना दक्षिणेकडील एका माथेफिरूनें त्यांच्या डोक्यावर गोळी झाडली. या माथेफिरूचें नांव जॉन वाइल्क्स बूथ असें होतें व पेशानें तो नट होता. या प्रकारानंतर कांहीं तासांच्या आंतच लिंकन गतप्राण झाले. त्यांचें थोर कार्य समाप्त झालें होतें.

**दयाळूपणा**—शांततेसाठीं लिंकन यांनीं ज्या योजना आंख-लेल्या होत्या त्यावरून त्यांचा सूज्ञपणा व दयाळूपणा दिसून येतो. दक्षिणेकडील बंडखोर राज्यांना युद्ध सुरू केल्याबद्दल शिक्षा करणें जरूरीचें आहे या मताशीं ते सहमत होऊं शकले नाहींत. त्यांनीं पुढील शब्द उच्चारले, "कोणाचा मत्सर न करतां ........व सर्वांसंबंधीं उदारपणा बाळगून आपण राष्ट्राच्या जखमा बांधूं या."

वारसा—अमेरिकनांना व कित्येक राष्ट्रांच्या लोकांना अब्राहम लिंकन हे दयाळूपणा व लोकशाही यांचें आवडतें प्रतीक बनलेले आहेत. जनतेवरील, स्वातंत्र्यावरील व मानवाच्या चांगुलपणावरील त्यांची श्रद्धा हा अमेरिकन तत्त्वप्रणालीचा गाभाच आहे. लिंकन यांच्या चरित्राचा अभ्यास करण्यानें एका राष्ट्राच्या आत्म्याची ओळख होते.


IN THIS TEMPLE
AS IN THE HEARTS OF THE PEOPLE
FOR WHOM HE SAVED THE UNION
THE MEMORY OF ABRAHAM LINCOLN
IS ENSHRINED FOREVER

